सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय या योजनेंतर्गत अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः क्रीडासु ३०२५ /प्र.क्र.१६/क्रीयुसे-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीखः ३१ मार्च २०२५

**वाचा:-**

१) शासन निर्णय, शा.शि. व क्री. वि., क्र.राक्रीधो-२०१२/प्र.क्र.२६०/क्रीयुसे १, दिनांक ०१/०३/२०१४.
२) शासन निर्णय, शा.शि. व क्री. वि., क्र.क्रीडासु-१७२४/प्र.क्र.१५०/क्रीयुसे १, दिनांक १५/१०/२०२४.
३) सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे क्र क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/निधी मागणी / २०२४-२५/का. ९/४२१९ दिनांक ३०/१/२०२५.
४) वित्त विभाग परिपत्रक क्र अर्थसं-२०२४/प्र.क्र८०/अर्थ-३,दिनांक दिनांक १७/३/२०२५.
५) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे क्र. क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/निधी मागणी / २०२४-२५/का. ९/५४४८, दिनांक २६/३/२०२५.
६) शासन निर्णय, शा.शि. व क्री. वि., क्रीडासु३०२५/प्र.क्र.१६/क्रीयुसे १, दिनांक २८/०३/२०२५.
७) शासन निर्णय, शा.शि.व क्री. वि. क्र.पुनर्वि-२८२४/प्र.क्र.९९/अर्थसंकल्प, दि.२९/०३/२०२५.
८) सह संचालक, क्रीडा व युवक सेवा यांचे पत्र क्र. क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/निधी मागणी/ २०२४-२०२५/का.९/५६०९, दिनांक ३०/०३/२०२५

**प्रस्तावना:-**

क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य करणे ही क्रीडा धोरणातील एक महत्वाची शिफारस आहे. दर्जेदार क्रीडा सुविधा निर्माण करुन त्याद्वारे खेळाडूच्या कामगिरीत वाढ करून राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय खेळाडू निर्माण करण्यास चालना देणे, हे या योजनेचे उद्दिष्ट आहे. या संदर्भातील सविस्तर कार्यपध्दती उपरोक्त संदभर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णय दिनांक ०१ मार्च, २०१४ अन्वये विहीत करण्यात आली आहे. त्यानुसार पात्र संस्थांना क्रीडा सुविधा निर्मितीस ७५:२५ (शासनः संस्था) याप्रमाणे विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून अनुदान देण्यात येते. याअंतर्गत क्रीडा व युवक सेवा, संचालनालय पुणे यांचेकडून शासनास प्राप्त झालेल्या विविध संस्थांच्या प्रस्तावांना शासन निर्णयान्वये तत्वतः प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. अशा प्रशासकीय मान्यता दिलेल्या व अनुदानासाठी पात्र असलेल्या तसेच यापूर्वी अंशतः अनुदान (पहिला हप्ता /

पुढील हप्ता) देण्यात आलेल्या संस्थांचा उर्वरित निधी मागणीचा प्रस्ताव क्रीडा व युवक सेवा संचालनालयाकडून संदर्भ क्र. (३), (५) व (८) अन्वये शासनास सादर केला आहे.

२. सन २०२४-२५ करिता प्रस्तुत योजनेसाठी रु.१५००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली होती. सदर तरतूद उपरोक्त संदर्भ क्र.२ व ६ येथील शासन निर्णयान्वये पुर्णत: वितरित करण्यात आली आहे. प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या संस्थांना प्रथम हप्त्याचे अनुदान तसेच यापूर्वी अंशतः अनुदान (प्रथम / व्दितीय) देण्यात आलेल्या संस्थांना पुढील टप्प्यातील अनुदान उपलब्ध करुन देण्याकरीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात संबधित लेखाशिर्षाखाली संदर्भ क्र.७ येथील शासन निर्णयान्वये पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध झालेल्या तरतुदीमधून पात्र संस्थांना अनुदान /आर्थिक सहाय्य उपलब्ध करण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य या योजनेसाठी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध झालेल्या एकूण तरतूदीमधून रु.२५२४.२३ लक्ष (अक्षरी रुपये पंचवीस कोटी चोवीस लक्ष तेवीस हजार फक्त) इतकी तरतूद सोबत जोडलेल्या “परिशिष्ट-अ” मधील संबंधित ७६ पात्र संस्थांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्यानुसार वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यता खालील सर्व अटी व शर्तीच्या पुर्ततेच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

१. उपरोक्तनुसार निधी वितरीत करण्यापूर्वी संबंधित संस्थांनी स्वहिस्सा (२५%) खर्च करणे, यापूर्वी वितरीत निधीचा विनियोग पूर्णत: करणे, अनुदान मंजुरीच्या अटी शर्ती पुर्ण करून अनुदान मागणीचा प्रस्ताव यापुर्वी दिलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रासह विहीत मार्गाने क्रीडा व युवक संचालनालयाकडे सादर करणे या पुर्वअटींची पुर्तता करणे आवश्यक आहे. सदर बाबीची पुर्तता व प्रथम/पुढील टप्प्याचे अनुदान वितरीत करण्याबाबतच्या सर्व अटी शर्तीची पूर्तता झाल्यानंतरच व याबाबतची सविस्तर तपासणी केल्यानंतरच सोबतच्या प्रपत्रातील संस्थांना प्रपत्रात नमूद केल्याप्रमाणे अनुदान वितरीत करणे आवश्यक राहील.
२. शासन निर्णय दिनांक ०१ मार्च, २०१४ मधील परि. क्र. ४ (अ) व ४ (ब) येथील क्रीडा सुविधा प्रकल्पासाठीच्या अनुदान मंजुरीच्या सर्व अटी व शर्ती नुसार संबंधित संस्थांना अनुदान वितरीत करण्याची कार्यवाही करावी.
३. सोबतच्या “परिशिष्ट- अ” या विवरणपत्रातील अंतिम हप्त्याचे अनुदान वितरित करण्यात येणाऱ्या संस्थांना अनुदान वितरीत झाल्यानंतर प्रकल्प पूर्णत्वाचा दाखला, प्रकल्पाच्या छायाचित्रांसह व उपयोगिता प्रमाणपत्रासह लवकरात लवकर व कमाल १ वर्षाच्या कालमर्यादेत सादर करणे बंधनकारक राहील, अन्यथा वितरित अनुदान शासनाच्या प्रचलित दंडनीय व्याज दराने अनुदान वितरीत झाल्याच्या दिनांकापासून वसुल करण्यात येईल, ही अट मान्य असल्याचे हमीपत्र प्रतिज्ञापत्राद्वारे संबंधित संस्थेकडून घेण्यात यावे. तसेच प्रथम हप्ता मंजूर करण्यात आलेल्या संबधित संस्थेस एकूण मंजूर अनुदानाच्या १० टक्के रकमेची बँक गॅरेंटी घेणे आवश्यक राहील. त्यानुसार बँक

गॅरंटी व प्रतिज्ञापत्र संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांच्याकडे जमा करण्यात आल्यानंतर मंजुर रकमेच्या मर्यादेत वितरणासाठी उपलब्ध होणारा निधी संबंधीत संस्थांना आर. टी. जी. एस. प्रणाली व्दारे वितरीत करण्यात यावा.

४. शासन अनुदान व स्वहिस्सा खर्च करुन विनियोग प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील. प्रथम हप्ता मंजूर करण्यात आलेल्या संबंधित संस्थेकडून स्वहिस्सा २५% आणि देय अनुदानापैकी या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान प्रथम खर्च करून सदर बांधकामांच्या सद्यस्थितीतील छायाचित्रांसह सनदी लेखापालाच्या स्वाक्षरीचे खर्चाचे विवरणपत्र सादर केल्यानंतरच उर्वरित / पुढील टप्प्याचे अनुदान उपलब्ध करण्याची कार्यवाही करण्यात येईल. संबंधित संस्थेने स्वहिश्याची २५% रक्कम प्रथम खर्च करून वरील अनुक्रमांक (२) मध्ये नमूद केल्याप्रमाणे संबंधित जिल्हा क्रीडा अधिका-याकडे विवरणपत्र सादर केल्यानंतर संबंधित संस्थेची बँक गॅरंटी मुक्त करण्यात यावी.

५. सदर संस्थांनी यापुर्वी वितरित केलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र, ऑडीट रिपोर्ट,प्रगती अहवाल,जिल्हा क्रीडा अधिकारी यांचा जिओ टॅगिंग /मॅपिंग अहवाल, जिल्हा क्रीडा अधिकारी यांचा छायाचित्रासह तपासणी अहवाल व संस्थेचे अनुदानासाठीचे मागणी पत्र व यापूर्वी दिलेले अनुदान या सर्व बाबी तपासूनच सदर संस्थांना अनुदान वितरित करावे.

२. उपरोक्त अटींच्या पुर्ततेच्या अधीन राहून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य योजनेकरिता पुनर्विनियोजनाद्वारे मंजूर झालेल्या निधीच्या मर्यादेत व अनुदान मंजुरीच्या सर्व अटी शर्ती नुसार पात्र असल्याची खात्री केल्यानंतरच प्रपत्र-अ येथील संस्थांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे एकूण रु.२५२४.२३ लक्ष (अक्षरी रुपये पंचवीस कोटी चोवीस लक्ष तेवीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यात यावा.

३. क्रीडा सुविधा निर्मितीकरीता आर्थिक सहाय्य या योजनेसंदर्भात होणारा खर्च "मागणी क्र. ई-३ लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (४०) क्रीडा सुविधा, (४०) (०१) क्रीडा सुविधा निर्माण करण्यासाठी सहाय्य (कार्यक्रम) (२२०४ ५७०६), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध तरतूदीमधून करण्यात यावा. यासंदर्भात वित्त विभाग, परिपत्रक दि.१७/३/२०२५ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार व वित्त विभागाने निधी वितरणाबाबत वेळोवेळी दिलेले निदेश व सुचनांनुसार व वित्तीय नियमावलीनुसार उपरोक्त तरतूद वितरित करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

४. याकरीता संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर क्रीडा सुविधांकरिता संबंधित संस्थांना यापूर्वी वितरित केलेले अनुदान परिशिष्ट-अ मध्ये नमूद करावयाचे राहीले असल्यास त्याची खात्री करुनच निधी आहरित करण्याची सर्वश्वी जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग,अनौपचारिक संदर्भ क्र.१९९/व्यय-५, दिनांक २७.०३.२०२५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३१२११३४५६४२१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: CN = RANSING ANANDRAO DERE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT
Date: 2025.03.31 21:55:07 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा उपमुख्यमंत्री ( वित्त व नियोजन ), यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. उपमुख्यमंत्री ( नगर विकास व गृहनिर्माण) यांचे सचिव ,मंत्रालय ,मुंबई
५. मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. सर्व सन्मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य.
७. अपर मुख्य सचिव, (अ.का. क्रीडा विभाग), यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), १ / २, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
१०.महालेखापाल (लेखा परिक्षा), १ / २, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
११.संबंधित विभागीय क्रीडा उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२.संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी(क्रीडा संचालनालयामार्फत)
१३.संबंधित अधिदान व लेखाधिकारी, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१४.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१५.संबंधित वरिष्ठ कोषागार अधिकारी, ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१६.वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१७. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८.निवड नस्ती (क्रीयुसे-१).

शासन निर्णय क्रमांकः क्रीडासु ३०२५ /प्र.क्र.१६/क्रीयुसे-१ सोबतचे परिशिष्ट- अ

(रुपये लाखात)

| अ.क्र. १ | संस्थेचे नाव | प्रयोजन | प्रशासकीय मान्यतेनुसार मंजूर अनुदान | यापूर्वी वितरित करण्यात आलेले अनुदान | या शासन निर्णयान्वये मंजूर अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | जनसेवा सेवाभावी प्रतिष्ठान भोपणी, ता. देवणी, जि. लातूर. संचलित रसिका महाविद्यालय देवणी. जि. लातूर. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ४१.५० | ४८.५० |
| २ | महात्मा फुले ग्रामीण विकास सेवाभावी संस्था श्री. शिवाजी कनिष्ठ महाविद्यालय वाढवण (बु), ता. उदगीर, जि. लातूर. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ४०.०० | ५०.०० |
| ३ | महात्मा फुले ग्रामीण विकास सेवाभावी संस्था सोनवळा व्दारा संचलित महात्मा फुले महाविद्यालय जळकोट, जि. लातूर. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ३०.०० | ६०.०० |
| ४ | धर्मवीर दिलीपराव रहाटे शिक्षण व बहुउद्देशीय संस्था मेहकर जि. बुलढाणा | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ३०.०० | ६०.०० |
| ५ | सिध्दीविनायक शैक्षणिक सेवाभावी संस्था, देवगांव ता. केज, जि. बीङ | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ३०.०० | ६०.०० |
| ६ | भगवान साई सेवाभावी संस्था आनंदगांव ता. शिरुर, जि. बीड. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ३०.०८ | ५९.९२ |
| ७ | मातृभूमी प्रतिष्ठान, बार्शी | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ३०.०० | ६०.०० |
| ८ | विद्या भुवनशिक्षण शिक्षण प्रसारक मंडळ, मोहरखेड संचलित सिंदफणा पब्लिक स्कुल फुले पिंपळगांव, ता. माजलगांव, जि. बीड | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ३०.०० | ६०.०० |
| ९ | आदर्श बहुउद्देशीय शिक्षण संस्था, सेवादास नगर, ता. मुखेड, जि. नांदेड | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ३०.०० | ६०.०० |
| १० | पै. नारायण पाटील तालीम वक्रीडा मंडळ, जेऊर, ता. करमाळा, जि. सोलापूर. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ४०.०० | ५०.०० |
| ११ | मराठवाडा शिक्षण प्रसारक मंडळ संचलित सुंदरराव सोळंके महाविद्यालय, माजलगांव, जि. बीङ | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ३०.०० | ६०.०० |
| १२ | श्री. वेताळेश्वर शिक्षण संस्था हासेगांव, ता. औसा, जि. लातूर. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ०.०० | ९०.०० |
| १३ | महाराष्ट्र शिक्षण मंडळ संचलित आाबासाहेब काकडे कला महाविद्यालय बोधेगाव, ता शेवगाव जिल्हा अहिल्यानगर. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १०.०० | ८०.०० |
| १४ | सदगुरू वामनराव पै शिक्षण संस्था, कटफळ, ता. बारामती, जि. पुणे | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | २०.०० | ७०.०० |
| १५ | चंपावती क्रीडा मंडळ, ता. जि. बीड | इनडोअर हॉलमध्ये बॅडमिंटन कोर्टच्या | १२.६० | ०.०० | १२.६० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | वुडन फ्लोरींगचे काम करणे. | | | |
| १६ | श्रीराम बहुउद्यदेशीय सेवाभावी संस्था, मोहा, ता. कळंबे, जि. उस्मानाबाद. | ॲस्ट्रोटर्फहॉकी मैदान तयार करणे. | ५६.२५ | १०.०० | १०.०० |
| १७ | श्री. शिवाजी शिक्षण संस्थाव्दारा डॉ. पंजाबराव उपाख्य भाऊसाहेब देशमुख स्मृती वैद्यकीय महाविद्यालय, अमरावती . | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ६० | १० |
| १८ | पार्वती लाड एज्युकेशन सोसायटी, ता. पलुज, जि. सांगली | बंदिस्त प्रेक्षागृह | ६७.५० | १० | १० |
| १९ | संस्कृती संवर्धन मंडळ, जि. नांदेङ | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ३५.०० | ५५.०० |
| २० | फादर ॲग्नेल मल्टीपर्पज स्कुल ॲन्ड ज्युनियर कॉलेज, वाशी नवी मुंबई | बंदिस्त प्रेक्षागृह | ६७.५० | १०.०० | ५२.९६ |
| २१ | संत ज्ञानेश्वर शिक्षण संस्था, इस्लामपूर चे अण्णा डांगे महाविद्यालय, हातकणंगले, जि. कोल्हापूर | बंदिस्त प्रेक्षागृह | ६७.५० | ५.०० | ६२.५० |
| २२ | रामरत्न एज्युकेशन फाऊंडेशन, इस्लामपुर, ता. वाळवा, जि. सांगली. | जलतरण तलाव | ३७.५० | ०.०० | ३७.५० |
| २३ | ज्ञानगंगा शिक्षण प्रसारक मंडळ, एकशिव, संचलित गोविंद आश्रमशाळा, एकशिव,ता.माळशिरस,जि.सोलापूर | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १५.०० | ५०.०० |
| २४ | सरस्वती विद्या विकास मंडळ, अहमदपुर, व्दार संचलित कमला नेहरु विद्यालय अहमदपुर ता. अहमदपुर, जि. लातूर. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ०.०० | ९०.०० |
| २५ | श्री. ज्ञानेश्वर समाज प्रबोधन संस्था, पेठ, ता. चिखली, जि. बुलढाणा | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १०.०० | ८०.०० |
| २६ | सातारा सैनिक स्कुल, सातारा. | लॉन टेनिस सिंथेटिक मैदान. | १५.०० | ५.०० | १०.०० |
| २७ | भैरवनाथ शिक्षण प्रसारक मंडळ, पारवाडी, ता. बारामती, जि. पुणे. | १८०*१०० मैदानासह ८ लेन्सचा धावनमार्ग | २७.०० | १०.०० | १७.०० |
| २८ | कर्मवीर पुंजाबाबा गोवर्धने कला, वाणिज्य व विज्ञान महा. इगतपुरी, टाके घोटी, जि. नाशिक. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | २५.०० | ६५.०० |
| २९ | दिनदयाळ वनवासी विकास संस्था संचलित अश्वथामा माध्यमिक विद्यालय, जुने धडगांव, जि. नंदुरबार | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ४२.५० | ४७.५० |
| ३० | श्रीराम शिक्षण संस्था, पाणिव, ता. माळशिरस, जि. सोलापूर. | जलतरण तलाव | ९०.०० | ८०.०० | १०.०० |
| ३१ | प्रवरा रुरल एज्यु. सोसायटी प्रवरा कन्या विद्या व क. महा. लोणी, ता. राहता, जि. अहमदनगर. | जलतरण तलाव | ३७.५० | १०.०० | २७.५० |
| ३२ | महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी, सदाशिव पेठ, पुणे | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १०.०० | ५०.०० |
| ३३ | प्रवरा ग्रामीण शिक्षण संस्था या संस्थेचे प्रवरा पब्लिक स्कुल, लोणी खुर्द, ता. राहता, जि. अहमदनगर | ४०० मीटर धावनपथ | १५.०० | ०.०० | १५.०० |
| ३४ | जिजामाता शिक्षण संस्था व्दारा संचलित, सुखदेवानंद माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, ता. भांडेगांव, ता. जि. हिंगोली. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ०.०० | ९०.०० |
| ३५ | परशुराम टावरे क्रीडांगण भिवंडी (प), जि. ठाणे | बंदिस्त प्रेक्षागृह | ६७.५० | ४२.५० | २५.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३६ | पंडीत दिनदयाय उपाध्याय संचलित सेवा प्रतिष्ठान नांदेड संचलित राणी लक्ष्मीबाई मुलींचे हायस्कुल व ज्युनियर कॉलेज, ता. बिलोली, जि. नांदेड | जलतरण तलाव | ९०.०० | ७८.५० | ११.५० |
| ३७ | स्वर्गीय मदनलालजी किसनलालजी संचेती सेवा समिती मलकापुर, जि. बुलढाणा. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ७२.५० | १७.५० |
| ३८ | मलकापुर शिक्षण समिती, मलकापुर, ता. मलकापुर, जि. बुलढाणा | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ३२.७५ | ५७.२५ |
| ३९ | स्वामी विवेकांनद कनिष्ठ महाविद्यालय, जळगांव. | ४०० मीटर धावनपथ | १५.०० | १०.०० | ५.०० |
| ४० | नागपुर व्यायामशाळा, नागपुर | बंदिस्त प्रेक्षागृह | ३०.०० | १०.०० | २०.०० |
| ४१ | एस. पी. कॉलेज, पुणे. | बंदिस्त प्रेक्षागृह | ६७.५० | ५८.०० | ९.५० |
| ४२ | नवसह्याद्री चॅरीटेबल ट्रस्ट, चाकण, ता. राजगुरूनगर, जि. पुणे. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ५८.५० | ३१.५० |
| ४३ | माताजी  शिक्षण संस्था संचलित महात्मा फुले माध्यमिक आश्रमशाळा, वाघा, जि. नांदेड | जलतरण तलाव | ९०.०० | १०.०० | ८०.०० |
| ४४ | महर्षी प्रतिष्ठान श्री. साई शांतीनिकेतन स्कुल आंतरवरली, ता. नेवासा, जि. अहमदनगर. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ५०.०० | ४०.०० |
| ४५ | व्यंकटेश्वरा शिक्षण संस्था, पेठ, वाळवा, जि. सांगली. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ८०.०० | १०.०० |
| ४६ | श्री. प्रतापशेठ चॅरीटेबल ट्रस्ट, अमळनेर, जि. जळगांव | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ७५.५० | १४.५० |
| ४७ | मातोश्री सेवाभावी मंडळ, औंढा, ता. जि. हिंगोली. | बंदिस्त प्रेक्षागृह | ३०.०० | १०.०० | १०.०० |
| ४८ | श्री. दत्ता मेघे बाल कल्याण शिक्षण संस्था नागपूर व्दारा संचालित स्कुल ऑफ स्कॉलर्स, यवतमाळ. | लॉन टेनिस सिंथेटिक मैदान. | १५.०० | ५.०० | १०.०० |
| ४९ | यशवंत शिक्षण संस्था वीरबाग, सुरूरचे शिवाजी विद्यालय, सुरूर, ता. जि. सातारा | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ००.०० | ९०.०० |
| ५० | नवोन्मेष आणि संशोधन फांऊडेशन व्दारा संचलित उबंटु इंग्लिश मिडीयम स्कुल, यवतमाळह, बंदिस्त सभागृह, यवतमाळ | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ०.०० | ९०.०० |
| ५१ | म्हसवड नगरपरिषद म्हसवड, मौ. वीरकरवाडी, ता. माण, जि. सातारा. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ४५.०० | १०.०० |
| ५२ | ग्रामपंचायत मौ. हेळगांव, ता. कराड, जि. सातारा. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १५.०० | १०.०० |
| ५३ | एच.एम. एस. रिसर्च ॲन्ड एज्यु फाऊंडेशन, जालना | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १७.५० | १०.०० |
| ५४ | अतुल विद्यामंदीर वर्धा व्दारा संचलित राजर्षी शाहू महाराज विद्यालय, चांदूर रेल्वे. जि. अमरावती. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १७.५० | १५.०० |
| ५५ | भिमाशंकर ग्रामोद्योग संस्था, पिंपळगांव, बसवंत, ता. निफाड, जि. नाशिक | जलतरण तलाव | ४५.०० | १५.०० | ५.०० |
| ५६ | दत्ता मेघे बालकल्याण शिक्ष्ज्ञण संस्था, नागपूर व्दार संचलित स्कुल ऑफ स्कॉलर्स धामणगांव रेल्वे जि. अमरावती | बास्केटबॉल मैदान तयार करणे. | ७.५० | ५.०० | २.५ |
| ५७ | वीर बाजीप्रभू क्रीडा व व्यायाम मंडळ बेलोरा, ता. चांदूरबाजार,जि. अमरावती | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १५.०० | १०.०० |
| ५८ | वसंतराव अडसुळ सामाजिक बहुउद्देशीय संस्था, लोहटा, कळंब, जि.उस्मानाबाद | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १०.०० | १०.०० |
| ५९ | ग्रामपंचायत खवणे, पिंपरी, ता. सेलु, जि. परभणी. | बंदिस्त प्रेक्षागृह | ३०.०० | २०.०० | १०.०० |
| ६० | रहिमतपुर नगर परिषद क्रीडा संकुल, मौ. रहिमतपूर, ता. कोरेगांव, जि. सातारा. | बंदिस्त प्रेक्षागृह | ३०.०० | १०.०० | १०.०० |
| ६१ | भंडारा जिल्हा वॉटर स्पोर्टस अकादमी, ता. जि. भंडारा | जलक्रीडा सुविधा | ३७.५० | ३०.०० | ७.५.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ६२ | पहूर ग्रुप एज्युकेशन सोसायटी संचलित आ.टी. लेले हायस्कुल व ज्यु. कॉलेज पहूर, ता. जामनेर. | बंदिस्त प्रेक्षागृह | ६७.५० | ६०.०० | ७.५० |
| ६३ | सांगोला शिक्षण प्रसारक मंडळ सांगोला, जि. सोलापूर | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ००.०० | ९०.०० |
| ६४ | कयाकिंग ॲन्ड कनोईंग, असो. परभणी. | जल क्रीडा सुविधा | ३७.४३ | १०.०० | १०.०० |
| ६५ | ज्ञानेश्वर समाज प्रबोधन संस्था, पेठ, ता. चिखली, जि. बुलढाण ( अ.क्र.२५ येथे पहावे) | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १०.० | ००.०० |
| ६६ | प्रकाशचंद जैन बहुउद्देशीय संस्था, जामनेर, ता. जामनेर, जि. जळगांव | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १५.०० | १०.०० |
| ६७ | भवानी ग्रामविकास व संशोधन संस्था, काटी, ता. तुळजापुर, जि. उस्मनाबाद | बंदिस्त प्रेक्षागृह | ६७.५० | १०.०० | २५.०० |
| ६८ | ग्रामपंचायत कार्यालय खांडवी, ता. बार्शी, जि. सोलापूर. | बंदिस्त प्रेक्षागृह | ३०.०० | १०.०० | १०.०० |
| ६९ | नगर पंचायत शेंदुर्णी, ता. जामनेर, जि. जळगांव | बंदिस्त प्रेक्षागृह | ३०.०० | १०.०० | १०.०० |
| ७० | ग्रामपंचायत पहुरपेठ, ता. जामनेर, जि. जळगांव. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ७०.०० | १०.०० |
| ७१ | भाऊसाहेब मुळक चॅरीटेबल नागपूर व्दारा संचलित भाऊसाहेब मुळक कॉलेज ऑफ डी फार्मसी, जि. नागपूर | बंदिस्त प्रेक्षागृह | ३७.५० | १४.५ | ५.०० |
| ७२ | ग्रामपंचायत चमक खुर्द, ता. अचलपुर, जि. अमरावती | बंदिस्त प्रेक्षागृह | ३०.०० | ५.०० | १०.०० |
| ७३ | कोल्हापूर महानगरपालिका कोल्हापूर | जलतरण तलाव | ९०.०० | २०.०० | २०.०० |
| ७४ | आनंद शैक्षणिक सामाजिक सेवाभावी संस्था, काळजगोरे, ता. पन्हाळा, जि. कोल्हापूर | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ३२.५ | १०.०० |
| ७५ | स्वातंत्र्य सैनिक शिक्षण संस्था, देवर्जन, ता. उदगीर, जि. लातूर. | प्रमाणीत आकाराचे फुटबॉल मैदान तयार करणे. | ७.५० | ०.०० | ७.५० |
| ७६ | मायनी भाग शिक्षक प्रसारक मंडळ, मायनी ता. खटाव, जि. सातारा. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ०.०० | १४.०० |
| **एकूण अक्षरी रुपये पंचवीस कोटी चोवीस लक्ष तेवीस हजार फक्त** | | | | | २५२४.२३ लक्ष |

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: CN = RANSING ANANDRAO DERE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT
Date: 2025.03.31 21:55:19 +05'30'

**(रणसिंग डेरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**